मा. न्यायालयात पुढील सुनावणीच्या दिनांकाच्या
तीन दिवस अगोदर प्रतिज्ञापत्र दाखल करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
शासन परिपत्रक क्रमांकःसंकिर्ण-२०१०/प्र.क्र.९१५/पोल-११,
गृह विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक :- १६ नोव्हेंबर, २०१०.

## परिपत्रक

शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, उच्च न्यायालयात निरनिराळ्या न्यायालयापुढे शासनाच्या विरूध्द दाखल केलेल्या अनेक प्रकरणांमध्ये विहित मुदतीमध्ये शपथपत्र दाखल करण्यात येत नाहीत. तसेच, संबंधीत सरकारी अभियोक्ता / सरकारी वकील यांना योग्य त्या सूचना वेळेत दिल्या जात नाहीत. त्यामुळे न्यायदानाच्या कामकाजामध्ये अडथळा निर्माण होऊन विलंब होतो. अशाच काही प्रकरणी प्रतिज्ञापत्र न दाखल केल्यामुळे मा. उच्च न्यायालयाने संबंधीत अधिकाऱ्यांकडून कॉस्ट वसुल करण्याचे आदेश दिले असून, सदर बाब शासनाच्या निदर्शनास आणलेली आहे. शासनाने यासंदर्भात यापूर्वी सूचना देऊन देखील उपरोक्त परिस्थितीमध्ये सुधारणा झाल्याचे दिसून येत नाही. पोलीस महासंचालक कार्यालयाने देखील क्र.पोमसं/२३/५४/न्यायालय उपस्थिती/९४१/२००९, दिनांक ०८/१०/२०१० च्या परिपत्रकान्वये या संदर्भात सविस्तर सूचना निर्गमित केलेल्या आहेत.

२. अशा घटनांची पुनरावृत्ती टाळण्याच्या दृष्टीने खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत असून सर्व संबंधीतांनी त्याचे काटेकोरपणे पालन करावे :-

(१) प्रबंधक (विधी), मा. उच्च न्यायालय यांच्या दिनांक २३ जुलै, २००७ च्या परिपत्रकानुसार, उच्च न्यायालयाकडून याचिकेची प्रत प्राप्त झाल्यानंतर, प्रस्तुत न्यायालयीन प्रकरणाच्या पुढील सुनावणीच्या किमान तीन दिवस अगोदर योग्य ते प्रतिज्ञापत्र मा. न्यायालयाच्या नोंदणी शाखेत (Registry) दाखल करण्याची कार्यवाही संबंधीत अधिकाऱ्याने करणे आवश्यक असून, पुढील सुनावणीच्या किमान तीन दिवस अगोदर प्रतिज्ञापत्र दाखल करण्याकरीता संबंधीत अधिकारी यांनी सरकारी अभियोक्ता / सरकारी वकील यांच्याशी तीन दिवसांपूर्वीच संपर्क करून, योग्य ते प्रतिज्ञापत्र तयार करून, पुढील सुनावणीच्या किमान तीन दिवस अगोदर दाखल करण्याची दक्षता घ्यावी.

(२) एखाद्या प्रकरणात प्रतिज्ञापत्र पुढील सुनावणीच्या तीन दिवस अगोदर दाखल करणे शक्य नसल्यास, संबंधीत अधिकाऱ्याने सरकारी अभियोक्ता / सरकारी वकील यांच्याशी त्वरीत संपर्क साधून, त्याबाबतची कारणे त्यांच्या निदर्शनास आणावीत. त्यामुळे मा. न्यायालय आणि विरोधी पक्षाचे वकील यांच्या पूर्वपरवानगीने पुढील सुनावणीच्या तारखेत बदल करणे शक्य होईल.

(३) कार्यालय प्रमुखांनी न्यायालयीन प्रकरणांमध्ये संबंधीत अधिकाऱ्याने वेळीच प्रतिज्ञापत्र दाखल करण्याची कार्यवाही केलेली आहे, याची खात्री करून घ्यावी.

(४) संबंधीत अधिकारी / कर्मचारी यांनी याबाबत कसुरी केल्यास संबंधीतांविरूध्द चौकशी करून पुढील उचित कार्यवाही करावी.

(कृ.मा.प.

ROTA-H 2681 (350-11-2010)।

३. सदर सूचना सर्व विभाग प्रमुखांनी संबंधीतांच्या त्वरीत निदर्शनास आणाव्यात व कोणत्याही परिस्थितीमध्ये सदरहु सूचनांचे पालन करण्याचे, तसेच प्रतिज्ञापत्र दाखल करण्याची कार्यवाही त्वरीत करण्याची संबंधीतांनी दक्षता घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(प्रवीण दीक्षित)
प्रधान सचिव (विशेष), महाराष्ट्र शासन.

प्रत,

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभाग,
अपर पोलीस महासंचालक, राज्य गुन्हा अन्वेषण विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे,
अपर पोलीस महासंचालक, लोहमार्ग, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
परिक्षेत्रीय सर्व विशेष पोलीस महानिरीक्षक,
कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
कारागृह उप महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
कारागृह उप महानिरीक्षक, पश्चिम विभाग, पुणे,
कारागृह उप महानिरीक्षक, दक्षिण विभाग, मुंबई,
कारागृह उप महानिरीक्षक, मध्य विभाग, औरंगाबाद,
कारागृह उप महानिरीक्षक, पूर्व विभाग, नागपूर,
सर्व पोलीस आयुक्त (लोहमार्गसहीत),
सर्व पोलीस महानिरीक्षक (परिक्षेत्र),
सर्व पोलीस अधीक्षक (लोहमार्गसहीत),
संचालक, सरकारी अभियोक्ता, उच्च न्यायालय, मुंबई,
अपर मुख्य सचिव (गृह) यांचे स्वीय सहाय्यक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
प्रधान सचिव (अपील व सुरक्षा) यांचे स्वीय सहाय्यक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
प्रधान सचिव (विशेष) यांचे स्वीय सहाय्यक, गृह विभाग, मंत्रालय, मुबई,
सचिव (परिवहन) यांचे स्वीय सहाय्यक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
सर्व सह सचिव / उप सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
सर्व अवर सचिव / कार्यासन अधिकारी, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
निवड नस्ती (पोल - ११).

- - - -

H 2681-13